**हिंगणघाट, जिल्हा वर्धा येथील जिल्हा न्यायाधिश १ व अतिरिक्त सत्र न्यायाधिश हिंगणघाट व दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर हिंगणघाट यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत ....**

# महाराष्ट्र शासन

**विधी व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डीडीओ २०१७/प्र.क्र.१५९/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० जून, २०१७

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः सीआरसी २५१७/प्र.क्र.१६/का.१२, दिनांक ३१ मार्च, २०१७
२ शासन पूरकपत्र विधि व न्याय क्रमांकः याचिका २०१७/प्र.क्र.८०/का.१२, दिनांक ०३ एप्रिल, २०१७
३ शासन अधिसूचना विधि व न्याय क्रमांकः सीआरसी २५१७/प्र.क्र.७९/का.१२, दिनांक ०१ एप्रिल, २०१७
४ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश वर्धा यांचे पत्र दिनांक २१.०४.२०१७

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक ३१ मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये हिंगणघाट व समुद्रपूर या तालुक्यांसाठी हिंगणघाट, जिल्हा वर्धा येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र. (२)येथील दिनांक ३ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर न्यायालयाच्या खर्चासाठी लेखाशीर्ष निश्चित करण्यात आले आहे. अ.क्र. (३) येथे नमूद दिनांक ०१ एप्रिल, २०१७ रोजीच्या अधिसूचनेन्वये दिनांक ०३.०४.२०१७ पासून जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय हिंगणघाट व दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर हिंगणघाट ही दोन्ही न्यायालये कार्यान्वित झाली आहेत. सद्य:स्थितीत जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय व दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) हिंगणघाट यांचेसाठी नियमित आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त होईपर्यंत दिवाणी न्यायालय (कनिष्ठ स्तर) हिंगणघाट यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले आहे. यास्तव, संदर्भाधीन दिनांक २१.०४.२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश वर्धा यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून जिल्हा न्यायाधिश १ व अतिरिक्त सत्र न्यायाधिश हिंगणघाट आणि दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर हिंगणघाट यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

हिंगणघाट, जिल्हा वर्धा येथील जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय हिंगणघाट यांचेसाठी जिल्हा न्यायाधिश १ व अतिरिक्त सत्र न्यायाधिश हिंगणघाट; आणि दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर हिंगणघाट यांचेसाठी दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर हिंगणघाट यांना "कार्यालय प्रमुख" तसेच, “आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तिय बाबींपुरतेच मर्यादीत राहतील.

२. सदर शासन निर्णय, वित्तिय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे..

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२०१६३१२१२६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2017.06.20 16:27:45 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे-१/२), उच्च न्यायालय अपील शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय वर्धा,
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
४. जिल्हा न्यायाधिश १ व अतिरिक्त सत्र न्यायाधिश, हिंगणघाट, जिल्हा वर्धा,
५. दिवाणी न्यायाधिश वरिष्ठ स्तर हिंगणघाट, जिल्हा वर्धा,
६. जिल्हा कोषागार अधिकारी वर्धा,
७. उप कोषागार अधिकारी, हिंगणघाट, जिल्हा वर्धा,
८. कक्ष अधिकारी का.७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (का.१२)